महाराष्ट्र राज्य सहकारी दूध महासंघ मर्या., (महानंद), मुंबई चे राष्ट्रीय दुग्धविकास महामंडळामार्फत (NDDB) पुनरूज्जीवन करण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एमएलके- २०२४/प्र.क्र.२९/पदुम-८(ई.क्र.७४७२१९)**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय- विस्तार, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: १५ मार्च, २०२४

**वाचा :**

१. राष्ट्रीय दुग्धविकास मंडळाचा अहवाल दि.२.१.२०२३
२. राष्ट्रीय दुग्धविकास मंडळाचा सुधारीत अहवाल दि.३१.१.२०२४
३. व्यवस्थापकीय संचालक, महानंद यांचे पत्र क्र.मसं/१/व्य.सं./रा.दु.वि. मंडळ/सु.डीपीआर/२०२३-२४/२६२५,दि.०१.०२.२०२४
४.महानंद संचालक मंडळ बैठक क्र.१३, ठराव क्र.१२(१)/१३/२०२४,दि.२०.२.२०२४
५. सहनिबंधक, सहकारी संस्था (दुग्ध), महाराष्ट्र राज्य यांचे आदेश क्र.आदुवि-५/सी-१/महानंद/प्रशासक/कलम ७७ अ/७८/२०२४,दि.२८.२.२०२४.

**प्रस्तावना:-**

राज्यातील दुध उत्पादकांचे हित विचारात घेऊन दूध उत्पादक शेतकऱ्यांच्या दुधाला राज्यातील मोठ्या शहरात बाजारपेठ उपलब्ध करून देण्यासाठी “महाराष्ट्र राज्य सहकारी दूध महासंघ (महानंद), मुंबई” ची स्थापना केली गेली. महाराष्ट्र राज्य सहकारी दूध महासंघ (महानंद), मुंबई ही सहकार क्षेत्रातील दुग्धव्यवसायातील सर्व जिल्हा/तालुका सहकारी दूध संघांची राज्यस्तरीय शिखर संस्था असुन, महासंघाची त्रिस्तरीय संरचना आहे.

“महानंद” या ब्रॅण्डने महाराष्ट्रात दूध व दुग्धजन्य पदार्थांची विक्री करण्यात येत आहे. महासंघाच्या स्थापनेनंतर सुरूवातीच्या काही वर्षात जवळजवळ सर्व जिल्हा व तालुका दूध संघ महासंघास दूध पुरवठा करीत होते. तथापि, त्यानंतर सदरच्या संघांनी स्वत: आवेष्टन करून वितरणास मोठ्या प्रमाणात सुरूवात केली. तसेच राज्यातील खाजगी क्षेत्रातही फार मोठ्याप्रमाणात दूध संकलन व वितरण सुरू झाले.

दूध संकलन व वितरणात घट झाल्यामुळे सन २००४-०५ मध्ये नफ्यात असलेला महासंघ सन २०१६-१७ पासून तोटयात आला असून,सन २०२०-२१ पासून महासंघाचे दैनंदिन कामकाज करणेही जिकरीचे झाले आहे.

वरील वस्तुस्थिती विचारात घेता, शासनाने महासंघाचे बळकटीकरण, आधुनिकीकरण व व्यवसायवृध्दीसाठी मा.मंत्रिमंडळाच्या मान्यतेने दि.६.९.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये महासंघास सुमारे रू.७० कोटी इतका निधी दूध भुकटी व बटरच्या स्वरूपात उपलब्ध करून दिला. त्यानंतरही महानंदच्या आर्थिक स्थितीत अपेक्षित सुधारणा दिसून आली नाही.

त्यांनतर महानदंच्या आर्थिक स्थितीत सुधारणा करण्यासाठी शासनाने राष्ट्रीय दुग्धविकास मंडळास अहवाल सादर करण्याबाबत सूचना देण्यात आल्या. त्यानुसार राष्ट्रीय दुग्धविकास मंडळाने दि.२.१.२०२३ रोजी महानंदास अहवाल सादर केला. सदर अहवालावर सचिव (पदु) यांचे स्तरावर चर्चा होऊन अभ्यासपूर्ण वाजवी व संयुक्तिक अहवाल सादर करण्याबाबत राष्ट्रीय दुग्धविकास मंडळाला सूचित करण्यात आले. त्यासंदर्भाने राष्ट्रीय दुग्धविकास मंडळाने दि.३१.१.२०२४ रोजी सुधारीत अहवाल महानंदास सादर केला.

राष्ट्रीय दुग्धविकास मंडळाचा अहवाल महानंदाने दि.०१.०२.२०२४ रोजी शासनास सादर केला आहे. तसेच सदर अहवालाच्या अनुषंगाने महानंदाच्या संचालक मंडळाने दि.२०.२.२०२४ रोजी ठराव क्र.१२(१)/१३/२०२४ पारित करून महानंदचे राष्ट्रीय दुग्धविकास मंडळामार्फत पुनरूज्जीवन करण्याचा एक भाग म्हणून महानंदच्या संचालक मंडळाने राजीनामा दिला.

राष्ट्रीय दुग्धविकास मंडळाने सादर केलेला अहवालाबाबतचा मंत्रिमंडळ प्रस्तावावर दि.१३.३.२०२४ रोजीच्या मा.मंत्रिमंडळ बैठकीत चर्चा झाली. सदर बैठकीत मा.मंत्रिमंडळाने दिलेल्या मान्यतेस अनुसरून सन २०२४-२५ ते २०२८-२९ या ५ वर्षासाठी महानंदावर प्रशासक म्हणून राष्ट्रीय दुग्धविकास मंडळाची नेमणूक करण्याबाबत निर्णय घेण्यात आला.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र राज्य सहकारी दूध महासंघ मर्या.,(महानंद) या दूध सहकार क्षेत्रातील शिखर संस्थेचे पुनरूज्जीवन करण्यासाठी शासन पुढीलप्रमाणे मान्यता देत आहे.

१. महानंद प्रकल्पाचे व्यवस्थापन व प्रचालन "राष्ट्रीय दुग्ध विकास मंडळ NDDB"मार्फत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.
२. महानंदचे संचालक मंडळ महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम, १९६० तील तरतूदीन्वये बरखास्त झाल्याने विद्यमान प्रशासकाच्या जागी NDDB ला प्रशासक म्हणून सन २०२४-२५ ते २०२८-२९ या ५ वर्षांसाठी नियुक्त करण्यात येत आहे.
३. सचिव (पशुसंवर्धन व दुग्धव्यवसाय विकास), महाराष्ट्र शासन यांच्या अध्यक्षतेखाली **'सुकाणू समिती'** गठीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे. सदर समितीची संरचना पुढीलप्रमाणे:-

सचिव (पशुसंवर्धन व दुग्धव्यवसाय विकास),---अध्यक्ष

व्यवस्थापकीय संचालक, NDDB ---सदस्य

आयुक्त, पशुसंवर्धन, पुणे -------- सदस्य

आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास----- सदस्य

व्यवस्थापकीय समितीचे अध्यक्ष -----सदस्य

व्यवस्थापकीय संचालक, महानंद----सदस्य सचिव

**समितीची कार्यकक्षा:-**

I. पुनर्वसन योजनेच्या प्रगतीचा आढावा घेणे.

II. योजनेच्या यशस्वी अंमलबजावणीसाठी धोरण आणि अंमलबजावणी सहाय्य करणे.

III. महानंदचा शाश्वत व चिरंतन व्यवसायवृध्दी होण्यासाठी नाविन्यपूर्ण योजना, प्रकल्प (Plan) सुचविणे.

४. राष्ट्रीय दुग्ध विकास मंडळ कायदा, १९८७ (१९८७ चा ३७) कलम १२ (१) नुसार NDDB "**व्यवस्थापन समिती**" (Management Committee) नियुक्ती करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

५. उत्तरदायित्व सुनिश्चित करण्यासाठी आणि दीर्घकालीन वचनबद्धतेसाठी राष्ट्रीय दुग्ध विकास मंडळाच्या व्यवस्थापकीय समितीमार्फत महानंदावर **तज्ज्ञ व्यवस्थापकीय संचालकाची** (Professional MD) नियुक्त करण्यात मान्यता देण्यात येत आहे. सदर नियुक्तीस सुकाणू समितीची सहमती घ्यावी.

६. उपरोक्त पुनरूज्जीवन योजनेसाठी लागणारा एकूण रू.२५३.५७ कोटी इतका निधी महानंदास भागभांडवल स्वरूपात उपलब्ध करून देण्यास मान्यता देण्यात येत आहे. सदर निधी पुढीलप्रमाणे वर्षनिहाय उपलब्ध करुन देण्यास मान्यता येत आहे. :-

रू.कोटी

| तपशील | २०२४-२५ | २०२५-२६ | एकूण |
|---|---|---|---|
| स्वेच्छानिवृत्ती योजनेसाठी | १३८.८४ | - | १३८.८४ |
| गोरेगांव येथील विद्यमान प्लांटच्या नूतनीकरणासाठी | ४५.०० | - | ४५.०० |
| थकबाकी/प्रलंबित देयके अदा करण्याकरीता | १२.१६ | - | १२.१६ |
| मनुष्यबळाच्या थकीत वेतनासाठी | ३५.२५ | - | ३५.२५ |
| भागभांडवलामध्ये वृध्दीकरणासाठी | १७.५८ | ४.७४ | २२.३२ |
| **एकूण** | **२४८.८३** | **४.७४** | **२५३.५७** |

७. राष्ट्रीय दुग्धविकास मंडळामार्फत राबविण्यात येणारी महानदंच्या पुनर्वसन योजनेतंर्गत सन २०२४-२५ मध्ये रू.२४८.८३ कोटी इतका निधी वर्षाच्या सुरूवातीस एकरक्कमी उपलब्ध करून देण्यास मान्यता देण्यात येत आहे.

८. महानंदाचे पुनर्वसन करतांना NDDB ने सहकारी संस्थांची त्रिस्तरीय संरचना राहील यासाठी प्रयत्न करावे. याकरिता गावपातळीवर “एक गाव, एक दूध संस्था” राहील, दूध उत्पादक शेतकरी हे सदर संघाचे सदस्य राहतील.

९. महानंदाच्या कर्मचाऱ्यांच्या सेवानिवृत्तीसाठी लागणाऱ्या निधीव्यतिरीक्त उर्वरीत घटकांसाठी लागणारा निधी सचिव (पदु) यांच्या मान्यतेने वितरीत करण्यात येईल.

१०.लातूर येथील प्रकल्प शासनाने महानंदास भाडेतत्वावर देण्यात आला आहे. सद्यस्थितीत सदर प्रकल्प बंद अवस्थेत आहे. त्यामुळे लातूर येथील प्रकल्प शासन परत घेत आहे. सदर प्रकल्प आयुक्त, दुग्धव्यवसाय यांचेकडे हस्तांतरीत करण्याची कार्यवाही व्यवस्थापकीय संचालक, महानंद यांनी करावी.

११.महानंदाच्या पुनर्वसन योजनेसाठी शासन व NDDB यांच्यामध्ये आवश्यक तो करारनामा करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

१२.सदर अनुदानासाठी नवीन स्वतंत्र लेखाशीर्ष उघडण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**<u>अटी व शर्ती:-</u>**

NDDB मार्फत महानंदाचे पुनरूज्जीवन करण्यासाठी पुढील अटी व शर्तीच्या अधीन राहून मान्यता देण्यात यावी.

**१.** केंद्र/राज्य शासनामार्फत राबविण्यात येणाऱ्या योजनांमध्ये सहभागी होणे बंधनकारक राहील.

**२.** महानंदच्या जागेचे इतर कोणसही हस्तांतरण/फेरवाटप/पोटनियोजन (Sub lease/Sub let) करता येणार नाही. तसेच या जमिनीवर अथवा कोणत्याही भागावर/स्थावर व जंगम संपत्तीवर/यंत्रसामुग्रीवर, साहित्यावर, पुनर्वसन योजनेच्या काळात निर्माण झालेल्या संपत्तीवर अन्य व्यक्ती/संस्था/कंपनी इत्यादींचे कोणत्याही प्रकारे हक्क निर्माण होतील अशाप्रकारे कोणताही आर्थिक व्यवहार करता येणार नाही.

**३.** विषयांकीत जमिनीवर बांधकाम करण्यासाठी प्रचलित नियमावलीनुसार व आवश्यकतेप्रमाणे संबंधित विभाग/शासकीय यंत्रणा यांची पूर्वपरवानगी /मान्यता/ना हाकत प्रमाणपत्र इ. घेणे बंधनकारक राहील.

**४.** पुनरूज्जीवन योजनेतंर्गत NDDB ने “महानंद” हा ब्रॅण्डच वापरावा. ब्रॅण्डचे नाव बदलता येणार नाही.

**५.** NDDB कडे असणाऱ्या महानंदाच्या ५ वर्षाच्या व्यवस्थापन कालावधीत नवीन पदभरती/निर्मिती करावयाची झाल्यास त्यास शासनाची पूर्वमान्यता घेणे अनिवार्य राहील.

**६.** महानंदाच्या जागेचे संरक्षण/देखभाल करण्याची सर्वस्वी जबाबदारी राष्ट्रीय दुग्ध विकास मंडळ (NDDB) यांची राहील.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारकि संदर्भ क्रमांक २३२/२०२४/व्यय-२,दि.१५.३.२०२४ अन्वये तसेच मा.मंत्रीमंडळाने दि.१३.३.२०२४ रोजी दिलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३१५१९२६४७५३०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ASHWINI BHIMRAO YAMGAR

Digitally signed by ASHWINI BHIMRAO YAMGAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=f0b627b3230194fa84bd0e5b4eb590e81c2c15ce998ba19f4825b4ac3eee13ce, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1E31BE6F920A3D606925AB728A537257F35F1F0BE19B929C1B0DDCBA1E89366B, cn=ASHWINI BHIMRAO YAMGAR
Date: 2024.03.15 19:36:07 +05'30'

**(अश्विनी यमगर)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल,महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.मंत्री पदुम/मा. राज्यमंत्री पदुम यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा.विरोधी पक्षनेता,विधानसभा, महाराष्ट्र राज्य
५. मा.विरोधी पक्षनेता,विधान परिषद , महाराष्ट्र राज्य
६. मा.मुख्य सचिव,महाराष्ट्र राज्य मंत्रालय,मुंबई
७. सचिव (पदु) यांचे स्वीय सहायक कृषि, पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. अध्यक्ष, राष्ट्रीय दुग्धविकास मंडळ, आनंद
९. आयुक्त, दुग्ध व्यवसाय विकास, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१०. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी दूध महासंघ, गोरेगांव,मुंबई
११. प्रादेशिक दुग्ध व्यवसायविकास अधिकारी सर्व.
१२. जिल्हा दुग्ध व्यवसाय विकास अधिकारी, सर्व
१३. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१४. निवडनस्ती/पदुम-८